महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र.१०८/ऊर्जा-७

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

तारीख: २५ फेब्रुवारी,२०१५.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसं-३, दिनांक ९.२.२०१५.

२) शासन परिपत्रक उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक: बीयुडी-२०१४/२०१४-१५/(७७०)/ प्रशासन-१, दिनांक ९ एप्रिल,२०१४.

३) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण,पुणे यांची क्रमांक लेखा/बीपी-००६/ एन.आर.एस.ई./ १४-१५ /३०११,५६३१,६०१८ व ६६१७ अनुक्रमे दिनांक १२ मे,२०१४,२९ सप्टेंबर,२०१४,१२ नोव्हेंबर, २०१४ व २४ डिसेंबर,२०१४ ची पत्रे.

४) समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक १७ जून, २०१४.

**प्रस्तावना -**

अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत विविध योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये चार महिन्यांच्या (एप्रिल ते जुलै) खर्चासाठी लेखानुदानाने रु.९.०० कोटी एवढी तरतूद उपलब्ध झालेली होती. सदर निधी वितरणासाठी दि.१७ जून,२०१४ रोजी आदेश निर्गमित करण्यात आले. या आदेशावर अधिदान व लेखा कार्यालयाने उपस्थित केलेल्या आक्षेपांची पूर्तता करुन अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत विविध योजना राबविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महासंचालक,महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण,पुणे यांनी केलेल्या विनंतीनुसार अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीसाठी महासंचालक,महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण,पुणे यांना रु.१३,१२,५०,०००/- (रुपये तेरा कोटी बारा लाख पन्नास हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र.४ येथील दिनांक १७ जून,२०१४ रोजीचा शासन निर्णय याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.ब.शे.मांडवे,उपसचिव,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री.वि.म.राजूरकर,अवर सचिव, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर अनुदान महासंचालक,महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावे.

५. अपारंपरिक ऊर्जा साधने अंतर्गत विविध योजनांवरील खर्चाचा, उद्दीष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम केवळ अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची खातरजमा करण्यात यावी.

७. सदर अनुदान लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाने आवश्यक तेव्हा महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

८. याबाबतचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८१० अपारंपरिक ऊर्जा साधने, ८०० इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजना (००) (०१) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (२८१० ००३४), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१/१४६१,दिनांक ६.२.२०१५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ८३/२०१५, दिनांक १६.२.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या त्या-त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१७४२४५८२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parkar Suryakant V

Digitally signed by Parkar Suryakant V
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Parkar Suryakant V
Date: 2015.02.25 17:52:08 +05'30'

**सु.व.पारकर**

कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे.

२. महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.

३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.

४. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

५. वित्त विभाग,व्यय-१६/अर्थसंकल्प-३,मंत्रालय,मुंबई-३२.

६. नियोजन विभाग,का-१४६१, मंत्रालय,मुंबई-३२.

७. आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

८. अवर सचिव (रोख शाखा/प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०.निवड नस्ती, ऊर्जा-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.